**शासकीय रोपवाटीकेच्या जमिनी**
**<u>हस्तांतरीत न करण्याबाबत</u>**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्र. फरोवा-२०११/ प्र.क्र.२१५/१३ अे**
**मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-३२,**
**दिनांक : १७ ऑक्टोबर, २०११.**

**<u>वाचा :-</u>**

१) कृषि व पदुम विभागाचे पत्र क्रमांक-ताबिके-२००९/प्र.क्र.१७२/१-अे, दिनांक २१/४/२०१०
२) संचालक (फलोत्पादन) यांचे पत्र क्र.फलो-१/रोवाजमीन/धोरण/१०२१/१०, दिनांक ५/४/२०११

**शासन निर्णय :-**

राज्यात १३४ शासकीय फळरोपवाटीका असून या फळरोपवाटीकांवर आंबा, चिकु, डाळींब, पेरु, आवळा, चिंच, जांभूळ, सिताफळ, संत्रा, मोसंबी, अंजीर इ. फळपिकांच्या विविध वाणांचे मातृवृक्षांचे जतन व संवर्धन करण्यात येते. याद्वारे गुणवत्तापूर्ण व दर्जेदार कलमा-रोपांची निर्मिती केली जाते. अशा दर्जेदार व कीड-रोगमुक्त कलमा-रोपांची वृध्दी करुन त्यांचा शेतकऱ्यांना पुरवठा केला जातो. रोहयो फळबाग लागवड कार्यक्रमांतर्गत तसेच खुल्या विक्रीद्वारे शेतकऱ्यांना कलमे-रोपे उपलब्ध करुन दिली जातात.

या फळरोपवाटीकांवर रोपवाटीका बळकटीकरण योजनेअंतर्गत पायाभूत सुविधांची उदा.शेडनेट हाऊस, ग्रीन हाऊस, हार्डनिंग शेड, पॉटींग शेड, मिस्ट चेंबर इत्यादींची उभारणी करण्यात येते. त्याद्वारे दरवर्षी सुमारे ८५ लाख कलमा-रोपांचे उत्पादन करण्यात येत आहे. राज्यात फलोत्पादनाखालील क्षेत्र वाढत असून कलमा-रोपांची मागणी वाढत आहे. भविष्यात कलमा-रोपांना मोठ्या प्रमाणावर मागणी वाढणार आहे. यामध्ये आधुनिक तंत्रज्ञानाचा वापर करुन (हायटेक नर्सरी) दर्जेदार कलमे-रोपे निर्मितीचे भविष्यात नियोजन आहे.

रोपवाटीकांच्या जमिनी ह्या कलमा-रोपांच्या उत्पादनासाठी खाजगी शेतकऱ्यांकडून योग्य मोबदला देऊन संपादित करण्यात आल्या असून सदरच्या जमिनी आता शहराजवळ आल्याने त्यांना मागणी वाढत आहे. शासकीय फळरोपवाटीकांच्या जमिनी हस्तांतरीत न करणेबाबत मा.प्रधान सचिव (कृषि व फलोत्पादन) यांनी सर्व जिल्हाधिकारी यांना दिनांक २१/४/२०१० च्या अ.शा.पत्रान्वये कळविले आहे. असे असले तरी अजूनही शासकीय रोपवाटीकांच्या जमिनींच्या मागणीचे प्रस्ताव प्राप्त होत आहेत. विविध लोकप्रतिनिधी, खाजगी संस्था, शासकीय विभाग, नगरपालिका, स्वायत्त संस्था, व्यक्ती यांचेकडून मागणी करण्यात येत आहे.

फळरोपवाटीकांचे महत्व व आवश्यकता विचारात घेता, सदरच्या जमिनी खाजगी संस्था, इतर शासकीय विभाग, नगरपालिका इत्यादी संस्थांना यापुढे कोणत्याही कारणासाठी न देण्याचा धोरणात्मक

निर्णय शासनाने घेतला असून कोणत्याही संस्थेचा जमिनीच्या मागणीचा प्रस्ताव यापुढे शासनाकडे पाठवू नयेत, अशा सूचना पुन्हा देण्यात येत आहेत. याचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे. तसेच कोणत्याही विभागाने यापुढे कृषि विभागाच्या अखत्यारीतील रोपवाटीकेच्या जमिनी परस्पर हस्तांतर करण्याबाबतचे आदेश निर्गमित करु नयेत.

सदर परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक (२०१११०१७११५६१९००१) आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**(अ. रा. राणे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन,**

प्रति,

मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.

मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव

मा.मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव

अप्पर मुख्य सचिव (महसूल), महसूल व वन विभाग, मंत्रालय.

सर्व विभागीय आयुक्त

आयुक्त कृषी, महाराष्ट्र राज्य,पुणे.

संचालक फलोत्पादन, कृषी आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य,पुणे,

सर्व संचालक, कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य,पुणे,

सर्व विभागीय कृषी सहसंचालक,

सर्व जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी,

सर्व जिल्हाधिकारी.

सर्व सहसचिव/उपसचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी, कृषि व पदुम (कृषि व फलोत्पादन) विभाग, मंत्रालय,मुंबई.

सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.

निवडनस्ती.